# निळा कोल्हा

पुन:लेखन आणि चित्रे:
मेहली गोभई



# निळा कोल्हा



मराठी अनुवादः
सुशील मेन्सन





एका गर्द हिरव्याशार जंगलाच्या सीमेवर वसलेल्या छोट्याशा गावात एक भित्रा कोल्हा राहात होता. त्याचे नाव होते, *कर्कश्श् केकटू*. तो अधिकतर वेळ एका गुहेत लपून राहात असे. कारण त्याला इतर जनावरांची फार भीती वाटत असे.

कधीकधी *कर्कश्श् केकटू*ला भयानक स्वप्ने पडत. एक मोठा वाघ त्याच्या धारदार, क्रूर नख्यांनी आपली शिकार करत आहे, असे दृश्य त्याला स्वप्नात दिसत असे.

पण संध्याकाळ झाल्यावर *कर्कश्श् केकटू*ला सुरक्षित वाटत असे. त्यावेळी तो इतर कोल्ह्यांच्या कळपात सामिल होऊन संध्याकाळची कोल्हेकुई गात असे. त्यावेळी तो स्वतःला काहीतरी खास समजत असे. कारण तो इतर कोल्ह्यांपेक्षा जास्त काळ आणि मोठ्या आवाजात केकटू शकत असे.





*कर्कश्श केकट्* शिकार करायला घाबरत असे. त्यामुळे तो बऱ्याचदा भुकेला राहात असे. एके संध्याकाळी, दिवसभर काही खायला न मिळाल्याने त्याच्या पोटात भुकेने गुडगुड आवाज होऊ लागला.

तो सावकाश पावले टाकत गावच्या बाजारानजिक आला आणि गर्द झाडीत लपून बसला. जवळच्या घरांतून रुचकर, मसालेदार *कोफ्ता* आणि *खिचडी*चा दरवळ सुटला होता.

दोन मुले संथपणे ऊस चघळत होते. आपल्यालाही ऊस खायला मिळाला असता तर!

त्याचवेळी एक मोठा, क्रूर दिसणारा कुत्रा उडी मारून आपल्या पायांवर उभा राहिला आणि गुरगुरु लागला. त्याने लपलेल्या कोल्ह्याचा वास ओळखला होता.







अचानक गावचे सगळे कुत्रे *कर्कश्श् केकटूच्या* मागे धावू लागले. *कर्कश्श केकटू* जीवाच्या आकांताने पळू लागला.





कुत्र्यांच्या धारदार जबड्यांपासून *कर्कश्श् केकटू* थोडासाच दूर होता. तो एका रंगाऱ्याच्या घराच्या अंगणात शिरला. धावताना तो नुकत्याच रंग दिलेल्या साड्यांना धडकला.

आपली उरलीसुरली ताकद गोळा करून *कर्कश्श केकटूने* एक मोठी झेप घेतली आणि तो निळा रंग ठेवलेल्या एका पिंपात जाऊन पडला. सर्वत्र निळ्या रंगाचे मोठाले शिंतोडे उडाले.



निळ्या रंगात बुडाल्यामुळे बिचाऱ्या *कर्कश्श् केकटू*चा श्वासच गुदमरला. निळा रंग त्याच्या नाकातोंडात गेला, पण त्याने हूं की चूं केले नाही. कारण कुत्रे जवळच कुठेतरी आहेत, हे त्याला माहीत होते.

तो पिंपाच्या तळाशी दबा धरून बसला. त्याचे सर्वांग निळ्या रंगात न्हाऊन निघाले. त्याचे शरीर पाणकावळ्याच्या पंखांसारखे चमकू लागले.

कुत्रे पिंपाच्या भोवताली वास घेत, गुरगुरत फिरू लागले. पण त्यांना *कर्कश्श केकटू*चा ठावठिकाणा काही लागला नाही. कोल्हा पळून गेला, असे समजून अखेरीस, ते सर्व निघून गेले.







सगळं शांत शांत झाल्यावर *कर्कशश् केकटू*ने आपले नाक वर उचलून पिंपाच्या काठावर ठेवले. त्याने सभोवतालचा वास घेतला. कुत्र्यांचा वास खूप दूरून येत होता. मग हळूच त्याचे डोळे पिपांबाहेर आले. त्याला भोवताली एकही कुत्रा दिसला नाही.

अचानक *कर्कशश् केकटू*ला काही आवाज ऐकू आले. हे आवाज अधिकाधिक जवळ येऊ लागले. काहीच क्षणात, रंग वाळलेल्या साड्या घेऊन जाण्यासाठी रंगाऱ्याचे कुटुंब अंगणात आले. एका पिंपातून निळ्या रंगाच्या कोल्ह्याने उडी घेतली, हे पाहून ते आश्चर्यचकीत झाले.

सगळे कुटुंबीय ओरडू लागले....









*कर्कशश् केकटू*च्या मनात एकच विचार आला – जीव वाचवा. आपल्या लांब लांब ढांगांवर पळत तो शक्य तितक्या वेगाने त्याच्या जंगलातील घराकडे पळू लागला.



निळ्या कोल्ह्याला पाहून जंगलातील सारी जनावरे गावातील लोकांपेक्षाही जास्त चकित झाली.

“याचे दात कदाचित विषारी असतील,” वाघाला वाटले. “तो किती ताकदीने प्रहार करू शकतो आणि त्याची नखं किती धारदार आहेत?” नाजुकशा सशाने चिंता व्यक्त केली.

“इंद्रदेवाने या भयानक निळ्या जनावराला आमच्यावर राज्य करायला तर पाठवलं नसेल?” चतुर माकडांनी शंका काढली.

स्वत:ला सुरक्षित ठेवण्यासाठी सारी जनावरे *कर्कश्श्* *केकटू*पासून दूर पळू लागली.





सगळी जनावरे दूर पळून गेल्यावर *कर्कश्श् केकटू* वडाच्या झाडाखाली बसला आणि विचार करू लागला.

एका गोष्टीमुळे त्याच्या मनाला गुदगुल्या होऊ लागल्या. जंगलातील सर्वात मोठ्या, शक्तिशाली आणि बुद्धिमान जनावरांनासुद्धा त्याचे भय वाटले होते.

*कर्कश्श् केकटू*ने दीर्घ श्वास घेतला. त्याची छाती फुगली आणि तो स्वतःला अतिशय शूर व हिंस्त्र समजू लागला.









जंगलातील सारे प्राणी आपल्याला घाबरतात, हे पाहून *कर्कश्श् केकटू*ने स्वत:ला त्यांचा राजा म्हणून जाहीर केले. लवकरच त्याच्या गर्वाचा पारा चढला आणि तो सर्वांवर सत्ता गाजवू लागला.

त्याने वाघाला प्रमुख मंत्री बनवले आणि मोराला संदेशवाहक. माकडे पाळीपाळीने त्याला पंख्याने वारा घालू लागली. सगळे प्राणी त्याच्याशी बोलण्याआधी त्याच्यासमोर गुडघे टेकून अदब दाखवू लागले.

निळ्या कोल्ह्याने जनावरांना खूप सारे रुचकर अन्नपदार्थ आणण्याची आज्ञा दिली- रसाळ आंबे, गोडगोड ऊसाचे गट्ठे आणि भरपूर ताजीतवानी उंदरे.

जंगलातील इतर कोल्हे मात्र राजा *कर्कश्श् केकटू*समोर झुकत नसत. ते कुणा कोल्ह्याला आपला राजा मानण्यास तयार नव्हते. म्हणून ते जंगलाच्या दुसऱ्या भागात राहायला गेले.





एकदा रात्री राजा *कर्कश्श् केकट्* त्याच्या आवडत्या जागी, टेकडीवर बसला होता. कधीकधी त्याला आपल्या विनम्र प्रजेपासून दूर एकांतात राहायला आवडत असे.

अचानक कोल्ह्यांची भयंकर कोल्हेकुई रात्रीची शांतता चिरत गेला. सर्व कोल्हे शिकारीसाठी त्यांच्या मनपसंत ठिकाणी पोहोचले होते.

कोल्ह्यांच्या कळपाची कर्कश्श् कोल्हेकुई *कर्कश्श् केकटूच्या* राजेशाही कानांपर्यंत पोहोचली. त्याचा स्वतःवरचा ताबा सुटू लागला. आपल्या सहकाऱ्यांना प्रतिसाद देण्याची तीव्र इच्छा त्याला झाली.

आपण जंगलातील प्राण्यांचे राजे आहोत, हे *कर्कश्श् केकटू* विसरूनच गेला. त्याने आभाळात नुकत्याच उगवलेल्या चंद्राकडे नाक वर करून पाहिले आणि आयुष्यातील सर्वात मोठी व दीर्घ कोल्हेकुई केली.





आपल्या राजाची ही कोल्हेकुई ऐकताच जंगलातील इतर जनावरांना मोठा धक्काच बसला.

ते धावत, सरपटत, उडत जंगलातून बाहेर आले. आपला राजा हा खरंतर निळ्या रंगाने माखलेला कोल्हा आहे, हे त्यांना कळले. आपण मूर्ख बनलो आहोत, हे लक्षात येताच त्यांना खूप संताप आला.

गुरगुरत, फुसफुसत आणि किंचाळत ते निळ्या कोल्ह्यावर तुटून पडले आणि त्याला जंगलातून दूर पळवून लावले.

निळा कोल्हा आता जंगलचा राजा राहीला नाही.





आता *कर्कश्श् केकटू*ला पोट भरण्यासाठी पुन्हा शिकार करावी लागते. त्याच्या अंगावर निळा रंग शिल्लक असला तरी तो फिका पडू लागला आहे.

लवकरच त्याला त्याचा मूळ रंग मिळेल. कदाचित तेव्हा इतर कोल्हे त्याला संध्याकाळची कोल्हेकुई गाण्यासाठी आपल्या कळपात पुन्हा सामील करून घेतील.

दरम्यान, भारतात लोक एका निळ्या कोल्ह्याची गोष्ट सांगतात. हा कोल्हा रात्र पडल्यावर एकटाच कोल्हेकुई करतो. यापूर्वी कधीही ऐकली नाही इतकी दीर्घ आणि दुःखद कोल्हेकुई!

## कथेविषयी थोडेसे

*निळा कोल्हा* ही एक प्राचीन दंतकथा आहे. ही कथा इ.स. पूर्व दोनशे वर्षांपूर्वी संस्कृत भाषेत लिहिली गेली होती. विद्वानांच्या मते, ही कथा यापेक्षाही प्राचीन आहे.

ही कथा पंचतंत्रातील चौऱ्यांऐंशी कथांपैकी एक आहे. *पंचतंत्र* हा नीतिकथांचा संग्रह आहे. दैनंदिन आयुष्यात शहाणपणाने कसे वागावे, हे या कथांमधून शिकायला मिळते.

पंचतंत्रातील कथा *विष्णुशर्मा* नावाच्या एका ऋषीमुनीने लिहिल्या आहेत, अशी आख्यायिका आहे. राजाच्या तीन मूर्ख मुलांना शिकवण्यासाठी त्याने या कथा रचल्या होत्या.

पंचतंत्रातील कथांचा अनुवाद जगभरातील अनेक भाषांमध्ये झालेला आहे. इंग्रजी भाषेतील पहिला अनुवाद *विल्यम कॅक्स्टन* यांनी केला होता. मध्यकालिन युरोपात पहिल्याप्रथम छपाई करण्यात आलेल्या पुस्तकांमध्ये पंचतंत्र या पुस्तकाचाही समावेश होता.

